**महाराष्ट्र राज्य पोलीस दलातील सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक/ पोलीस हवालदार / पोलीस नाईक व पोलीस शिपाई यांच्याकरिता पोलीस उपनिरीक्षक पदावर नियुक्तीसाठी मर्यादित विभागीय स्पर्धा (मुख्य) परीक्षा - २००८.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक -**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक ८ सप्टेंबर, २०१०**
**संदर्भ :- शासन परिपत्रक क्र. पीएसबी- ०३०८/प्र.क्र.५९४/ पोल-५(अ),**
**दि. ६ नोव्हेंबर, २००९**

**शासन परिपत्रक** :- महाराष्ट्र राज्य पोलीस दलातील **पोलीस उपनिरीक्षक पदावर नियुक्तीसाठी मर्यादित विभागीय स्पर्धा (मुख्य) परीक्षा - २००८** महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत **दिनांक १६ ऑक्टोबर, २०१०** रोजी मुंबईसह औरंगाबाद, नागपूर व पुणे या चार जिल्हाकेंद्रावर घेण्यात येणार आहे. परीक्षेचा कार्यक्रम, आरक्षित पदांचा व निवडपध्दतीचा तपशील, सोबत जोडलेल्या **परिशिष्ट "अ"** मध्ये नमूद केला आहे. प्रस्तुत परिपत्रक सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक, पोलीस हवालदार, पोलीस नाईक व पोलीस शिपाई या संवर्गातील सर्व कर्मचा-यांच्या **(रजेवर/ प्रतिनियुक्तीवर असणा-या कर्मचा-यांसह)** निदर्शनांस आणावे.

हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक संकेतांक **201009081910351001**...... असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

**( सदानंद जाधव )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रति,

१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने).
२) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
४) संचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, मुंबई.
५) अप्पर पोलीस महासंचालक, गुन्हा अन्वेषण विभाग (गुन्हे), पुणे
६) आयुक्त, गुन्हा अन्वेषण विभाग (गुप्तवार्ता), मुंबई.
७) विशेष पोलीस महानिरीक्षक, (प्रशिक्षण व खास पथके), मुंबई.
८) विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, मुंबई.
९) सर्व पोलीस उपमहानिरीक्षक.
१०) सर्व पोलीस अधीक्षक.
११) सर्व पोलीस आयुक्त, (मुंबई वगळून).

# परिशिष्ट - अ

१.१ आयोगातर्फे **३ जानेवारी, २०१०** रोजी घेण्यात आलेल्या **पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय स्पर्धा (पूर्व) परीक्षा - २००८** चा निकाल जाहिर करण्यात आला असून, सदर निकालाआधारे मुख्य परीक्षेसाठी अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांची **मुख्य परीक्षा** आयोगातर्फे **दि. १६ ऑक्टोबर, २०१०** रोजी घेण्यात येणार आहे. सदर पूर्व परीक्षेत अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांची पात्रता न तपासता **पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय स्पर्धा (मुख्य) परीक्षा - २००८** साठी प्रवेश देण्यात आलेला असून, सदर उमेदवारांना आयोगामार्फत मुख्य परीक्षेची प्रवेशप्रमाणपत्रे निर्गमित करण्यात येत आहेत. सदर मुख्य परीक्षेचा अर्ज विहीत पोस्ट कार्यालयात स्वीकारण्याचा अंतिम **दिनांक २९ सप्टेंबर, २०१०** हा आहे.

१.२ उपरोक्त मुख्य परीक्षेसाठी उमेदवारांनी आयोगाकडे विहित नमुन्यातील अर्ज सादर करणे आवश्यक आहे. त्याकरिता मुख्य परीक्षेसाठी अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांनी सदर परिपत्रक प्रसिध्द होताच विहित टपाल कार्यालयातून मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षांकरिता अर्ज व माहितीपुस्तिका (हिरव्या रंगाची) विकत घेऊन सदर परिपत्रकातील परिच्छेद ६ मधील सूचनांनुसार कार्यवाही करुन, विहित मुदतीत म्हणजेच **दिनांक २९ सप्टेंबर, २०१० पर्यंत** टपाल कार्यालयात अर्ज सादर करणे आवश्यक आहे. मुख्य परीक्षेसाठी विहित मुदतीत अर्ज सादर करणार नाहीत तसेच विहित शैक्षणिक अर्हता व सेवा कालावधीबाबतच्या अटींची पूर्तता करणार नाहीत अशा उमेदवारांची मुख्य परीक्षेसाठीची उमेदवारी कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल.

**१.३ पूर्व परीक्षेत अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांनीच मुख्य परीक्षेकरिता अर्ज सादर करावेत.**

**२. परीक्षेचे ठिकाण :-**

**२.१ मुख्य परीक्षा खालील चार केंद्रांवर घेण्यात येईल :-**

| परीक्षा केंद्र | केंद्र संकेतांक |
|---|---|
| औरंगाबाद | १५ |
| मुंबई | ३० |

| परीक्षा केंद्र | केंद्र संकेतांक |
|---|---|
| नागपूर | ३२ |
| पुणे | ३८ |

२.२ मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांना त्यांनी पूर्व परीक्षेसाठी घेतलेली परीक्षा केंद्रे विचारात घेवून आयोगातर्फे उपरोक्त चार जिल्हाकेंद्रांवर विभागून प्रवेश देण्यात आला आहे. त्यानुसार उमेदवारांना पाठविण्यात आलेल्या मुख्य परीक्षेच्या प्रवेशप्रमाणपत्रात परीक्षा केंद्र नमूद करण्यात आले आहे.

२.३ आयोगाने प्रवेश दिलेल्या परीक्षा केंद्रावरच उमेदवारांना मुख्य परीक्षेसाठी उपस्थित रहावे लागेल. परीक्षा केंद्र बदलून मिळण्याबाबतची विनंती कोणत्याही परीस्थितीत मान्य केली जाणार नाही.

२.४ मुख्य परीक्षेसाठी उमेदवारांना आयोगातर्फे उपरोक्त चार केंद्रावर विभागून प्रवेश देण्यात आलेला असल्याने उमेदवाराने मुख्य परीक्षेच्या अर्जात परीक्षा केंद्र क्रमांक नमूद करु नये.

**३. उपलब्ध पदसंख्या व आरक्षण :-**

| अ.क्र. | वर्गवारी | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | अमागास | १७२ |
| २ | अनुसूचित जाती | ३७ |
| ३ | अनुसूचित जमाती | २६ |
| ४ | विमुक्त जाती (अ) | ५ |
| ५ | भटक्या जमाती (ब) | ६ |
| ६ | भटक्या जमाती (क) | ७ |
| ७ | भटक्या जमाती (ड) | १२ |
| ८ | विशेष मागास प्रवर्ग | ५ |
| ९ | इतर मागास वर्ग | -- |
| | **एकूण -** | **२७०** |

**टीप - सदर पदसंख्येत व आरक्षणामध्ये बदल होण्याची शक्यता आहे.**

**४. पात्रता विषयक अटी :-**

**(अ) शैक्षणिक अर्हतेसह अनुभव :-** प्रस्तुत परीक्षेकरिता उमेदवारांची सहायक पोलीस उपनिरीक्षक/ पोलीस हवालदार/पोलीस नाईक व पोलीस शिपाई या पदावर नियमित नियुक्तीच्या दिनांकापासून **दिनांक १ जानेवारी, २००९** रोजी खालीलप्रमाणे किमान नियमित सेवा पूर्ण होणे आवश्यक आहे.

**१)** मान्यताप्राप्त विद्यापीठाच्या कोणत्याही शाखेचा **पदवीधर** असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत- **४ वर्ष**.

**२)** महाराष्ट्र माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची **एच.एस.सी.** परीक्षा उत्तीर्ण किंवा महाराष्ट्र शासनाने एच.एस.सी. च्या समतूल्य म्हणून मान्य केलेली अर्हता, अशा उमेदवारांच्या बाबतीत- **५ वर्ष**.

**३) एस.एस.सी.** परीक्षा उत्तीर्ण किंवा महाराष्ट्र शासनाने एस.एस.सी. च्या समतुल्य म्हणून मान्य केलेली अर्हता, अशा उमेदवारांच्या बाबतीत - **६ वर्षे**.

**(ब) वयोमर्यादा :-** उमेदवाराचे वय **दिनांक १ जानेवारी, २००९** रोजी गणले जाईल आणि वयोमर्यादा अमागासवर्गीय उमेदवारांच्या बाबतीत ३५ वर्षांपर्यंत व मागासवर्गीय उमेदवारांच्या बाबतीत ४० वर्षापर्यंत राहील.

**टीप :-**

**(१)** जे उमेदवार दिनांक १ जानेवारी, १९९१ नंतर मर्यादित विभागीय परीक्षेस बसण्यास पात्र होते तथापि, ज्यांना सन १९९८ आणि सन २००२ च्या मर्यादित विभागीय परीक्षांना वयोमर्यादेच्या कारणास्तव बसण्याची परवानगी देण्यात आली नव्हती, अशा उमेदवारांना पुढे तीन सलग होणा-या परीक्षांना बसण्याच्या तीन संधी देण्यात आल्या आहेत. मात्र जे उमेदवार सन २००६ व २००७ करिता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने घेतलेल्या परीक्षेस बसले नाहीत अशा उमेदवारांच्या बाबतीत त्यांनी ती संधी गमावली असे समजण्यात येऊन त्यांना आता केवळ एक संधी उपलब्ध होईल. तसेच जे उमेदवार परीक्षेस बसले होते, त्यांनाही आता केवळ एक संधी उपलब्ध होईल.

**(२)** एखाद्या वर्षी परीक्षा न झाल्यामुळे कमाल वयोमर्यादा पूर्ण होण्यापूर्वी परीक्षेच्या सलग ३ संधी मिळाल्या नसतील अशा उमेदवारांना कमाल वयोमर्यादेनंतर सलग होणा-या परीक्षेस बसण्याच्या यथास्थिती उर्वरीत संधी देण्यात येतील. कोणत्याही परिस्थितीत या सलग संधी ३ पेक्षा जास्त असणार नाहीत.

**५. अर्ज सादर करण्याची पध्द्त :-**

**५.१** मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षांकरिता अर्ज व माहितीपुस्तिका महाराष्ट्र राज्यातील पोस्ट कार्यालयात, पोस्ट कार्यालयाच्या कार्यालयीन वेळेत प्रत्येकी **रु. १००/- (रु. शंभर फक्त)** रोख भरून उपलब्ध होतील. कोणत्याही परिस्थितीत आयोगाच्या कार्यालयातून अर्ज पुरविण्यात येणार नाहीत. तसेच पोस्टाने अर्जांची मागणी केल्यास अर्ज पुरविला जाणार नाही.

**५.२** परिपूर्ण भरलेले अर्ज आवश्यक त्या प्रमाणपत्रांसह विहित परीक्षा शुल्क रोख भरुन **दि. २९ सप्टेंबर, २०१० पर्यंत सादर करणे आवश्यक आहे. कोणत्याही परिस्थितीत अर्ज स्वीकारण्याची कालमर्यादा काटेकोरपणे पाळली जाईल.**

**५.३** परीक्षेसाठी आयोगाकडून विहित केलेले अर्जच विचारात घेण्यात येतील. अर्जाच्या झेरॉक्स प्रती किंवा साध्या कागदावरील अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत.

**५.४** अर्ज व माहितीपुस्तिकेच्या विक्री व अर्जाच्या स्वीकृतीसाठी टपाल कार्यालयांची यादी पूर्व परीक्षेकरिता **दि. ६ नोव्हेंबर, २००९** रोजी निर्गमित केलेल्या शासन परिपत्रकानुसार तसेच मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षेच्या माहितीपुस्तिकेनुसार असेल.

**५.५** अर्ज व माहितीपुस्तिकेच्या विक्री व अर्जाच्या स्वीकृतीसाठी निश्चित करण्यात आलेल्या टपाल कार्यालयांची यादी आयोगाच्या **www.mpsc.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध आहे.

**६. महत्वाच्या सूचना :-**

**६.१** पूर्व परीक्षेच्या निकालाद्वारे मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांनी आवश्यक ती प्रमाणपत्रे व माहितीपुस्तिकेच्या परिशिष्ट-७ मधील प्रमाणपत्रासह परिपूर्ण भरलेले अर्ज आपल्या विभाग/कार्यालय प्रमुखांकडे सादर करुन त्यांचेकडून परिशिष्ट-७ प्रमाणित करुन घेणे आवश्यक आहे.

**६.२** गृह विभाग, पोलीस महासंचालक यांचे कार्यालय तसेच पोलीस खात्याची विभागीय कार्यालये व त्यांचे प्रमुख आणि संबंधित कर्मचारी यांना मार्गदर्शनासाठी व कार्यवाहीसाठी खालील सूचना देण्यात येत आहेत :-

६.२.१ सर्व संबंधित पोलीस कर्मचाऱ्यांनी स्वतःची शैक्षणिक पात्रता, वय, जात/जमात, क्रिमीलेअर, निवास इ. बाबतच्या नोंदी मूळ कागदपत्राबरोबर पडताळून मगच अर्जात नमूद कराव्यात. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (लहान कुटुंबाचे प्रतिज्ञापन) नियम २००५ दि. २८ मार्च, २००५ मधील तरतूदींनुसार शासकीय सेवेतील पदासाठी अर्ज करताना लहान कुटुंबाचे प्रतिज्ञापन अर्जासोबत सादर करावे.

६.२.२ कर्मचाऱ्यांनी अर्जात नमूद केलेल्या नोंदी बरोबर आहेत हे संबंधित कार्यालय प्रमुख/आस्थापना अधिकारी यांनी तपासून, संबंधित कर्मचाऱ्यांचा गोपनीय अभिलेख पाहून तो समाधानकारक असल्याचे माहितीपुस्तिकेतील परिशिष्ट-७ मधील प्रमाणपत्रात प्रमाणित करुन, अर्ज व प्रमाणपत्रे उमेदवारास तात्काळ परत करणे आवश्यक आहे. विभागाने या प्रमाणपत्रानुसार प्रमाणित केलेल्या उमेदवारांचाच निवडीसाठी विचार केला जाईल, म्हणून हे प्रमाणपत्र अत्यावश्यक आहे.

६.२.३ विभाग/कार्यालय प्रमुखांकडून परिशिष्ट-७ मधील प्रमाणपत्र घेतल्यानंतर हे प्रमाणपत्र आणि आवश्यक त्या अन्य सर्व प्रमाणपत्रांच्या प्रती अर्जास जोडून, परीक्षा शुल्कासह अर्ज विहित मुदतीत **(दिनांक २९ सप्टेंबर, २०१० पर्यंत)** टपाल कार्यालयात सादर करणे आवश्यक आहे. सदर अर्जावर उमेदवाराने स्वतःचे अलिकडच्या काळात काढलेले ३.५ x २.५ से.मी. आकाराचे छायाचित्र विहीत जागी चिकटवून छायाचित्राच्या खाली दर्शविलेल्या चौकटीत (BOX) उमेदवाराने स्वतःची स्वाक्षरी करणे आवश्यक आहे. उमेदवाराने **दिनांक २९ सप्टेंबर, २०१०** नंतर टपाल कार्यालयात सादर केलेले अर्ज स्वीकारले जाणार नाहीत. तसेच यासंदर्भातील अभिवेदने /विनंती यांचा विचार केला जाणार नाही याची कृपया नोंद घ्यावी.

६.३ उपरोक्त कार्यवाही करताना अर्ज कोणत्याही प्रकारे खराब होणार नाहीत, फाटणार वा चुरगळले जाणार नाहीत याची काळजी घ्यावी.

**७. परीक्षा शुल्क :-** मुख्य परीक्षेचे शुल्क रुपये **४००/- (मागासवर्गीयांसाठी रुपये २००/-)** परिपूर्ण भरलेल्या अर्जासोबत टपाल कार्यालयात रोखीने भरणे आवश्यक आहे. ते इतर कोणत्याही स्वरुपात स्वीकारले जाणार नाही. विहित परीक्षाशुल्काशिवाय अर्ज विचारात घेतला जाणार नाही. **एकदा भरलेले परीक्षा शुल्क कोणत्याही कारणास्तव परत केले जाणार नाही.**

**८. अर्जातील दाव्यांसंदर्भात :-**

८.१ पूर्व परीक्षेच्या अर्जात नमूद केलेली जातीविषयक वर्गवारी, क्रिमीलेअर, इ. दाव्यामध्ये मुख्य परीक्षेच्या वेळी फेरबदल करता येणार नाही. तसेच पूर्व परीक्षेचा अर्ज करताना जातीचे, क्रिमीलेअर, इ. प्रमाणपत्र उपलब्ध नसल्याने, केवळ अराखीव पदासाठी अर्ज केलेल्या उमेदवाराने मुख्य परीक्षेच्या वेळी आरक्षित पदासाठी दावा केल्यास तो ग्राह्य धरला जाणार नाही.

८.२ पूर्व परीक्षेच्या अर्जातील व मुख्य परीक्षेच्या अर्जातील माहितीमध्ये तफावत/विसंगती आढळून आल्यास अशा उमेदवाराची उमेदवारी निवडीच्या कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल.

**९. सदोष अर्ज नाकारणेबाबत :-** माहितीपुस्तिकेतील परि. क्र. ७.३ मध्ये नमूद केलेल्या कारणास्तव सदोष असलेले अर्ज नाकारले जातील किंवा उमेदवारी रद्द करण्यात येईल व त्याबाबतचा आयोगाचा निर्णय अंतिम राहील.

**१०. मुख्य परीक्षेच्या प्रश्नपत्रिका व अभ्यासक्रमाबाबत :-** मुख्य परीक्षा एकूण ३०० गुणांची आहे. या परीक्षेसाठी दोन अनिवार्य प्रश्नपत्रिका असून प्रश्नपत्रिका क्र.- १ वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरूपाची २०० गुणांची आणि दोन तासांची आहे. यापूर्वी प्रश्नपत्रिका क्र.- २ (विधी) हा पारंपरिक स्वरूपाचा १०० गुणांचा तीन तासाचा पेपर होता. तथापि शासन निर्णय क्र. पीएसबी- ०३०५/सी.आर.-२०/ पोल-५ अ, दि. २७ ऑगस्ट, २००९ नुसार प्रश्नपत्रिका क्र.- २ च्या परीक्षा योजनेत शासनाने बदल केला असून **प्रश्नपत्रिका क्र.- २ ही आता वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरूपाची १०० गुणांची एक तासाची करण्यात आली आहे.** तथापि परीक्षेच्या अभ्यासक्रमात कोणताही बदल करण्यात आलेला नाही. उपरोक्त दोन्ही प्रश्नपत्रिकांचा अभ्यासक्रम "मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षेकरिता अर्ज व माहितीपुस्तिकेतील" बाब क्र.२.३.६.३ मध्ये नमूद केल्यानुसारच आहे.

**११. मुख्य परीक्षेचा निकाल :-** माहितीपुस्तिकेतील परि. क्र. २.३.६.६ मध्ये नमूद केल्यानुसार मुख्य परीक्षेचा निकाल तयार करण्यात येईल.

**१२. शारीरिक चाचणी :** मुख्य परीक्षेच्या निकालाद्वारे जे उमेदवार आयोगाने विहित केलेल्या सीमांकन रेषेएवढे किंवा त्यापेक्षा जास्त गुण प्राप्त करतील त्या उमेदवारांनाच शारीरिक चाचणीस प्रवेश देण्यात येईल. सदर शारीरिक चाचणी १०० गुणांची असेल. यासंदर्भातील सविस्तर तपशील माहितीपुस्तिकेतील परि. क्र. २.३.६.७ मध्ये दिली आहे.

**१३. मौखिक व व्यक्तिमत्व चाचणी-** उपरोक्त शारीरिक चाचणीमध्ये उत्तीर्ण होणा-या उमेदवारांचीच मौखिक व व्यक्तिमत्व चाचणी घेण्यात येईल. सदर चाचणी ५० गुणांची असून, सदर चाचणीचा हेतू माहितीपुस्तिकेतील परि.क्र. ७.७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे राहील.

**१४. समान गुण धारण करणा-या उमेदवारांची प्राधान्य क्रमवारी :-** अंतिम शिफारस यादी तयार करताना समान गुण धारण करणा-या पात्र उमेदवारांची प्राधान्य क्रमवारी (Ranking) माहितीपुस्तिकेतील परि. क्र. ७.८ मध्ये नमूद केलेल्या निकषानुसार निश्चित करण्यात येईल.

**१५. अंतिम निवड :-**

**१५.१** माहितीपुस्तिकेतील परि. क्र. २.३.६.९ मध्ये नमूद केल्यानुसार अंतिम निकाल तयार करण्यात येईल. तद्नंतर अधिसूचित पदसंख्या व राखीव जागा यांच्या अधिन राहून अंतिम निकालातील गुणवत्ताक्रमानुसार अधिसूचित पदसंख्येइतक्या उमेदवारांची शिफारस शासनाच्या गृह विभागाकडे करण्यात येईल.

**१५.२ पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,** हे आयोग पुरस्कृत पात्र उमेदवारांना आवश्यक त्या प्रशिक्षणासाठी पाठविण्याचे आदेश काढतील.

**१५.३** आयोगाने शिफारस केलेल्या प्रत्येक उमेदवाराला संबंधित प्रशिक्षणासाठी प्रवेश वा त्या पदावर नियुक्ती मिळेलच असे नाही. आयोग पुरस्कृत उमेदवार सदर पदाच्या प्रशिक्षणासाठी सर्व दृष्ट्या योग्य आहे अशी शासनाची खात्री झाल्याखेरीज तसेच शासनाशी आवश्यक ते सर्व करार केल्याखेरीज संबंधितास प्रशिक्षणासाठी पाठविले जाणार नाही. संबंधित प्रशिक्षणाची अंतिम परीक्षा उत्तीर्ण होऊन ते प्रशिक्षण पूर्ण केलेल्या उमेदवारांना सदर विभागीय स्पर्धा परीक्षेतील गुणवत्ताक्रमानुसार "पोलीस उपनिरीक्षक" या पदावर महाराष्ट्रात कुठेही नियुक्ती देण्यात येईल. या नियुक्तीस शासन सेवेच्या सर्व अटी व शर्ती लागू असतील व नियुक्तीनंतर त्यांना सर्व आवश्यक प्रशिक्षण पूर्ण करावे लागेल.

**१६. गुणपत्रिका :-** मुख्य परीक्षेस उपस्थित असलेल्या उमेदवारांना मुख्य परीक्षा, शारीरिक चाचणी आणि मौखिक व व्यक्तीमत्व चाचणी यात मिळालेले गुण दर्शविणारी गुणपत्रिका टपालाने पाठविण्यात येईल.

**१७. गुणांची पडताळणी करण्याबाबतची पद्धत :-** माहितीपुस्तिकेतील परि. क्र. ७.११ मध्ये नमूद केल्यानुसार उमेदवारांना मुख्य परीक्षेत मिळालेल्या गुणांची पडताळणी करता येईल.

**१८. उमेदवारांना इशारा :-** अर्जात हेतुपुरस्सर खोटी माहिती देणे किंवा खरी माहिती दडवून ठेवणे किंवा त्यात बदल करणे किंवा दाखल्याच्या प्रतीतील नोंदीत अनधिकृतपणे खाडाखोड करणे किंवा खाडाखोड केलेले वा बनावट दाखले सादर करणे, आयोगाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन न करणे, परीक्षा कक्षातील गैरवर्तन, परीक्षेच्या वेळी नक्कल करणे, वशिला लावण्याचा प्रयत्न करणे यासारखे अथवा परीक्षा कक्षाच्या बाहेर अथवा परीक्षेनंतरही तसेच अन्य कोणतेही गैरप्रकार करणा-या उमेदवारांना गुण कमी करणे, विशिष्ट किंवा सर्व परीक्षांना वा निवडींना अनर्ह ठरविणे, काळया यादीत समाविष्ट करणे व प्रतिरोधीत करणे (DEBAR) यापैकी प्रकरणपरत्वे योग्य त्या शिक्षा करण्याचा तसेच प्रचलित कायदा व नियमाच्या अनुषंगाने योग्य ती कारवाई करण्याचे अधिकार आयोगाला असतील. यासंदर्भात शिस्तभंगाची कार्यवाही करण्याचे अधिकार त्यांच्या विभाग/ कार्यालय प्रमुखास असतील. तसेच त्याला विभाग प्रमुखाकडून/शासनाकडून शासकीय सेवेतून बडतर्फ केले जाण्याची शक्यता आहे. विहित केलेल्या अर्हतेच्या अटी पूर्ण न करणारा उमेदवार कोणत्याही टप्प्यावर निवड होण्यास अपात्र ठरेल आणि/किंवा इतर योग्य अशा शिक्षेला पात्र ठरेल.

**१९. परीक्षेतील गैरप्रकार करणा-यांना इशारा :-** आयोगातर्फे घेण्यात येणा-या परीक्षेत अथवा परीक्षेनंतरही कोणत्याही प्रकारचा गैरप्रकार करणे जसे प्रश्नपत्रिका फोडणे, बनावट प्रश्नपत्रिकांची विक्री करणे अथवा परीक्षेत अनधिकृत साहित्याआधारे नक्कल करणे, दुस-या उमेदवारांकडून मदत घेणे, दुस-या उमेदवारास मदत करणे अथवा कोणत्याही प्रकारे आपली ओळख पटेल अशी कृती करणे, वा तसा प्रयत्न करणा-या उमेदवारांवर तसेच उमेदवार नसलेल्या पण गैरप्रकार करणा-या व्यक्तीवर **" महाराष्ट्र प्रिव्हेन्शन ऑफ मालप्रॅक्टीसेस ॲट युनिव्हर्सिटी, बोर्ड ॲन्ड अदर स्पेसिफाईड एक्झामिनेशन्स ॲक्ट, १९८२"** खाली तसेच प्रचलित कायदा व नियमानुसार कारवाई करण्यात येईल. त्याव्यतिरिक्त संबंधित उमेदवारास सदर परीक्षेसाठी अथवा आयोगामार्फत घेण्यात येणा-या सर्व परीक्षा वा निवडीसाठी कायमस्वरुपी प्रतिरोधित (DEBAR) सुध्दा करण्यात येईल, याचीही उमेदवारांनी नोंद घ्यावी. तसेच त्याला विभाग प्रमुखाकडून/शासनाकडून शासकीय सेवेतून बडतर्फ केले जाण्याची शक्यता आहे.

**२०.** आयोगाचे अध्यक्ष, सदस्य किंवा अधिकारी/कर्मचारी यांच्यावर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दडपण आणण्याचा कोणताही प्रयत्न केल्यास अशा उमेदवारास आयोगाच्या निवडीपासून अपात्र ठरविण्यात येईल.

**२१.** प्रस्तुत परीक्षेचा अभ्यासक्रम परीक्षा योजना व अन्य माहिती अर्जासोबत पुरविलेल्या माहितीपुस्तिकेत नमूद केली आहे. ही बाब विभागाने सर्व संबंधितांच्या (रजेवर/ प्रतिनियुक्तीवर असणा-या कर्मचा-यांसह) प्रकर्षाने निदर्शनास आणावी.

******